**इयत्ता १० वी व १२ वीच्या परिक्षेत विशेष गुणांसह प्राविण्य मिळविणाऱ्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना प्रोत्साहनपर बक्षिस योजना**

# महाराष्ट्र शासन

**आदिवासी विकास विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- शाआशा-२०१९/प्र.क्र.२२८/का-१३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ३ जूलै, २०२३

<u>वाचा</u> :- १) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.शाआशा-२००३/प्र.क्र.१०२/का.१३, दिनांक १४/०८/२००३
२) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.शाआशा-२०१९/प्र.क्र.२२८/का.१३, दिनांक १६/०७/२०१९
३) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.शाआशा-२०१९/प्र.क्र.२२८/का.१३, दिनांक ३१/०७/२०१९
४) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.शाआशा/विबयो-२०२२/प्र.क्र.४३/का६(१०), दिनांक ०५/०७/२०२२

<u>प्रस्तावना :-</u>

अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांचा सर्वांगीण विकास व्हावा व त्यांना शिक्षणासाठी प्रोत्साहन मिळून गुणवत्तेबाबत विद्यार्थ्यांमध्ये आवड निर्माण व्हावी यासाठी राज्यातील इयत्ता १० वी व १२ वी मधील शालांत व उच्च माध्यमिक शालांत परिक्षेत विशेष गुणांसह प्राविण्य मिळविणाऱ्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना प्रोत्साहनपर बक्षिस योजना विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दिनांक १४/०८/२००३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुरू करण्यात आली आहे. सदर योजनेच्या अंमलबजावणीमध्ये संदर्भ क्र.२ व ३ येथील शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली आहे. सदर योजना राबविताना अडचणी येत असल्याचे आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये कळविले आहे. त्यामुळे सदर योजनेबाबत सर्वसमावेशक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

<u>शासन निर्णय :-</u>

आदिवासी विकास विभागांतर्गत राज्यात कार्यरत असलेल्या शासकीय आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा, नामांकीत शाळा, सैनिकी शाळा, एकलव्य मॉडेल रेसिडेंशियल स्कुलमधील इयत्ता १० वी व १२ वी मध्ये शिक्षण घेत असलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ (S.S.C. Board ) तसेच केंद्रीय माध्यमिक शिक्षण मंडळ (C.B.S.E. Board) मधून गुणवत्ता यादीत प्राविण्यासह गुण मिळवून राज्यात प्रथम येणाऱ्या ५ मुले व ५ मुली तसेच राज्यातील ९ विभागीय शिक्षण मंडळामध्ये प्रत्येक शिक्षण मंडळात प्रथम येणाऱ्या ३ मुले व ३ मुलींना प्रोत्साहनपर बक्षिस योजना राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**२.** शासकीय आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा, सैनिकी शाळा, नामांकीत शाळांमध्ये शिकत असलेले इयत्ता १० वी व १२ वीच्या परिक्षांमध्ये महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ (S.S.C. Board) मध्ये **राज्यस्तरावर** प्राविण्य मिळविणारे मुले व मुली.

| इयत्ता १० वी | | इयत्ता १२ वी | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | **कला** | | **वाणिज्य** | | **विज्ञान** | |
| मुले | मुली | मुले | मुली | मुले | मुली | मुले | मुली |
| ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ |

इयत्ता १० वी व १२ वी मधील मुले व मुली यांच्या एका गटासाठी येणारा खर्च (S.S.C. Board)

| **प्रावीण्य क्रमांक** | **बक्षीस रक्कम (₹)** |
|---|---|
| प्रथम | ३०,०००/- |
| द्वितीय | २५,०००/- |
| तृतीय | २०,०००/- |
| चतुर्थ | १५,०००/- |
| पाचवा | १०,०००/- |
| **एकूण** | **१,००,०००/-** |

इयत्ता १० वी व १२ वी मधील मुले व मुली या ८ गटांसाठी येणारा एकूण खर्च **₹ ८,००,०००** इतका खर्च अपेक्षित आहे. (S.S.C. Board)

३. नामांकीत शाळा व एकलव्य मॉडेल रेसिडेंशियल स्कुल मधून केंद्रीय माध्यमिक शिक्षण मंडळ (C.B.S.E.) मध्ये **राज्यस्तरावर** प्रावीण्य मिळविणारे मुले व मुली.

| इयत्ता १० वी | | इयत्ता १२ वी | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | **कला** | | **वाणिज्य** | | **विज्ञान** | |
| मुले | मुली | मुले | मुली | मुले | मुली | मुले | मुली |
| ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ |

इयत्ता १० वी व १२ वी मधील मुले व मुली यांच्या एका गटासाठी येणारा खर्च (C.B.S.E.. Board)

| **प्रावीण्य क्रमांक** | **बक्षीस रक्कम (₹)** |
|---|---|
| प्रथम | ३०,००० |
| द्वितीय | २५,००० |
| तृतीय | २०,००० |
| चतुर्थ | १५,००० |
| पाचवा | १०,००० |
| **एकूण** | **१,००,०००** |

इयत्ता १० वी व १२ वी मधील मुले व मुली या ८ गटांसाठी येणारा एकूण **₹ ८,००,०००** इतका खर्च अपेक्षित आहे. (C.B.S.E.. Board )

४. **राज्यस्तरावर प्रावीण्य अनुदान :-** उक्त परिच्छेद २ व ३ मधील एकूण १६ गटांतील विद्यार्थ्यांना प्रत्येकी ₹ १,००० याप्रमाणे १० महिन्यांकरिता ८० ( ८X५=४० + ८X५=४० ) लाभार्थी विचारात घेता, ₹ १,००० X १० महिने X ८० लाभार्थी = ₹ ८,००,०००/- असे एकूण S.S.C. Board व C.B.S.E. Board येथून राज्यस्तरावर प्रावीण्य मिळविणारे एकूण ८० विद्यार्थ्यांकरिता एकूण **₹ ८,००,०००** इतका खर्च अपेक्षित आहे.

५. महाराष्ट्र राज्यात **९ विभागीय मंडळे** असून महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ ( S.S.C. Board ) येथून प्राविण्य मिळविणाऱ्या एका विभागीय मंडळातील इयत्ता १० वी व १२ वी मधील मुले व मुली.

| **इयत्ता १० वी** | | **इयत्ता १२ वी** | | | | | | एकूण लाभार्थी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | **कला** | | **वाणिज्य** | | **विज्ञान** | | |
| मुले | मुली | मुले | मुली | मुले | मुली | मुले | मुली | २४ |
| ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | |

इयत्ता १० वी व १२ वी मधील मुले व मुली यांच्या एका गटासाठी येणारा खर्च ( S.S.C. Board )

| **प्रावीण्य क्रमांक** | **बक्षीस रक्कम (₹)** |
|---|---|
| प्रथम | २५,००० |
| द्वितीय | १५,००० |
| तृतीय | १०,००० |
| **एकूण** | **५०,०००** |

इयत्ता १० वी व १२ वी मधील मुले व मुली या ८ गटांसाठी येणारा एकूण खर्च **₹ ४,००,०००** इतका खर्च अपेक्षित आहे. ( S.S.C. Board )

६. केंद्रीय माध्यमिक शिक्षण मंडळ ( C.B.S.E. Board ) यांची विभागीय मंडळे नसल्याने ते वगळून उक्त परिच्छेद ५ मधील महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ (S.S.C. Board) येथील एका विभागीय मंडळातील १० वी व १२ वी (कला, वाणिज्य व विज्ञान शाखा) मधील ८ गटांकरिता येणारा खर्च = ५०,००० X ८ = ₹४,००,००० इतका खर्च अपेक्षित असून महाराष्ट्र राज्यातील ९ विभागीय मंडळांकरिता येणारा खर्च = ₹४,००,००० X ९ **= ₹ ३६,००,०००** इतका खर्च अपेक्षित आहे.

७. **विभागीय मंडळे प्रावीण्य अनुदानासाठी तरतूद -**

केंद्रीय माध्यमिक शिक्षण मंडळ ( C.B.S.E. Board ) यांची विभागीय मंडळे नसल्याने ते वगळून एका विभागीय मंडळातील महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ ( S.S.C. Board) मधील २४ विद्यार्थ्यांना बक्षिस देण्यात येणार असून ९ विभागीय मंडळात एकूण लाभार्थी विद्यार्थ्यांची

संख्या २४ X ९ = २१६ इतकी असून त्यांना प्रतिमाह ₹१००० याप्रमाणे X १० महीन्याकरिता **₹२१,६०,०००** इतका खर्च अपेक्षित आहे.

८. सदर योजनेसाठी एकूण ₹ १,००,००,००० ( रुपये एक कोटी मात्र ) इतका अंदाजित वार्षिक खर्च अपेक्षित असून प्रस्तुत योजनेसाठी येणारा खर्च मागणी क्रमांक टी-४, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, जनजाती क्षेत्र उपयोजना, ०२-अनुसूचित जमातींचे कल्याण, २७७-शिक्षण, (१२) १० वी व १२ वी मधील शालांत परिक्षेत विशेष गुणांसह प्राविण्य मिळविणाऱ्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना प्रोत्साहनपर बक्षिस योजना (१२) (०१) राज्य योजनांतर्गत योजना (२२२५-३४१-१) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

९. सन २०१९-२० व २०२०-२१ या कालावधीत कोविड-१९ च्या प्रादुर्भाव असल्याने या दोन वर्षासाठी सदर योजना न राबविता सन २०२२-२३ पासून राबविण्यात यावी.

१०. एकापेक्षा जास्त विद्यार्थ्यांना समान गुण असतील तर सर्वांना त्या क्रमांकाच्या बक्षिसाची रक्कम देण्यात यावी.

११. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२३०७०३१६१९२०५८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c4f0e8608020fad0064f5bd3c615be5666dc0af54fcf5038cc18559d51a472ba, pseudonym=DDE30B7B971C12AC5E78F6BE2C672CA11B7A98CE, serialNumber=2182F4F20DAA6841AB430B2FD812E7B5D3A883E72EFA574CA5E29FF528BC8015, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2023.07.03 16:20:53 +05'30'

**( वि. फ. वसावे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.४०० ०३२.
३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.४०० ०३२.
४. मा.मंत्री ( आदिवासी विकास ), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई :- ४०० ०३२.
५. सर्व मा. मंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. सर्व मा. विधानसभा सदस्य.
७. सर्व मा. विधानपरिषद सदस्य
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
११. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१२. निबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई, / नागपूर / औरंगाबाद खंडपीठ.
१३. सरकारी अभियोक्ता, मा. उच्च न्यायालय, मुंबई / नागपूर / औरंगाबाद. खंडपीठ

१४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.

१५. सर्व जिल्हाधिकारी.

१६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक

१७. अपर आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य नागपूर / नाशिक/ ठाणे / अमरावती.

१८. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१९. शिक्षण संचालक, (उच्च शिक्षण ) महाराष्ट्र राज्य, पुणे.

२०. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.

२१. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई

२२. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.

२३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

२४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

२५. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

२६. सर्व उप सचिव/ अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.

२७. उप सचिव ( व्यय-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

२८. सर्व प्राचार्य/ मुख्याध्यापक, शासकिय आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा, नामांकीत शाळा, एकलव्य मॉडेल रेसिडेशियल स्कुल, सैनिकी शाळा

२९. निवडनस्ती (का-१३ ).